अपंग व्यक्ती (समानसंधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ नुसार तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित तसेच स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील पदावर शारीरिकदृष्ट्या अपंगासाठी केंद्र शासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार सुयोग्य पदे निश्चित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय, क्र. अपंग २०११/(०६/११)/ताशि-१**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : १४/०१/२०११**

**वाचा** :- १) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१)
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही १०९८/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक ०२/०५/१९९८
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. अपंग १००५/(९१/०५)/आस्था-२ दिनांक १० ऑगस्ट, २००५.
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. अपंग २००६/(१६०/०६)/आस्था-२ दिनांक ०२ जुलै, २००८.
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. अपंग २००६/(१६०/०६)/आस्था-२ दिनांक ०१ जानेवारी, २००९.
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्र.न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३ दिनांक ०३ ऑगस्ट, २०१०.

**<u>प्रस्तावना</u>** :-

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १ (१९९६ चा-१) हा, अधिनियम दि. ०७ फेब्रुवारी १९९६ पासुन लागु झाला आहे. या कायद्यान्वये अपंगाच्या सर्वागिण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रधान करण्यासाठी शासन सेवेत ३ टक्के पदे आरक्षित करण्याची तरतूद आहे. त्याकरीता अपंग व्यक्तीसाठी पदनिश्चिती केलेली आहे. त्यानुसार या विभागाच्या अखत्यारीतीतल तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट "अ","ब","क", व गट-"ड" तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त संस्थेतील पदावर शारीरिकदृष्ट्या अपंगासाठी आरक्षण ठेवण्याकरीता संदर्भ क्र.३ ते ५ येथील अनुक्रमे दिनांक १० ऑगस्ट, २००५, दि. ०२ जुलै, २००८ व दि. ०१ जानेवारी, २००९ च्या शासन निर्णयानुसार पदनिश्चिती करण्यात आली आहे.

२. शासनाच्या विविध विभागामार्फत अपंगासाठी राखून ठेवण्यात आलेल्या पदांच्या पदनिश्चितीमध्ये एकवाक्यता नाही किंवा ती परिपूर्ण नाही, यासाठी अंपग व्यक्तींसाठी सुधारित पद निश्चिती करणे व त्यानुषंगाने अपंगाची राखीव पदे भरणे या संदर्भात मा. उच्च न्ययालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.२२५/२००९ दाखल करण्यात आली आहे. या याचिकेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबत निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.०६ येथील दिनांक ०३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये सूचित केल्याप्रमाणे या विभागाच्या नियंत्रणाखालील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण

संस्थेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच अपंगाच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार अपंगासाठी सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मा. उच्च न्यायालय, मुंबई यथे दाखल केलेल्या जनहित याचिका क्र. २२५/२००९ संदर्भात शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले असल्याने उपरोक्त संदर्भ क्र.३ ते ५ येथील अनुक्रमे दिनांक १० ऑगस्ट, २००५, दिनांक ०२ जुलै, २००८ व दिनांक ०१ जानेवारी, २००९ चे शासन निर्णय रद्द करण्यात येत आहेत.

२. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १ (१९९६ चा-१) हा, अधिनियम दि. ०७ फेब्रुवारी १९९६ पासुन लागु झाला आहे. या अधिनियमच्या अनुषंगाने शासनाने संदर्भ क्र.२ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०२ मे, १९९८ च्या शासन निर्णयान्वये शासन सेवेत अंध वा अंशत: अंध, कर्णबधीर, चलनवलन विषयक विकलांगता किंवा मेंदूचा आजार या व्याधीने ग्रस्त झालेल्या व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याच्या सूचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच संदर्भ क्र.६ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि. ०३ ऑगस्ट, २०१० नुसार शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार या विभागाच्या नियंत्रणाखालील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित तंत्र शिक्षण संस्थेतील पदे अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ च्या तरतूदीनुसार केंद्र शासनाच्या कार्यालयात कार्यरत असलेल्या आणि या विभागाच्या नियंत्रणाखालील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील समान पदावर कार्यरत आलेल्या पदांसाठी सरळ सेवा भरतीबाबत आरक्षण ठेवण्याबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील दि. ०३ ऑगस्ट, २०१० च्या परिपत्रकानुसार सूचित केल्याप्रमाणे या विभागाच्या नियंत्रणाखालील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित तंत्र शिक्षण संस्थेतील पदांकरीता कोणत्या वर्गवारीतील अपंग व्यक्तीसाठी आरक्षण ठेवावे याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

१. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५, (१९९६ चा-१) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार या विभागाच्या नियंत्रणाखालील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील मधील विविध संवर्गातील पदांवर अपंगत्वाचे प्रमाण किमान ४० टक्के असलल्या अपंग व्यक्तींना ३ टक्के पर्यंत फक्त सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्यात यावे.

२. संबंधिताकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यावर अशा उमेदवारांस शारिरीक पात्रतेसंबंधात विहित केलेल्या वैद्यकिय मंडळाने प्रस्तावित केल्यानंतरच अशा अपंग व्यक्तीची तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी व स्वायत्त अनुदानित तंत्र शिक्षण संस्थेमधील पदावर नियुक्ती करण्यात यावी. या शिवाय खालील निकषानुसार अशा अपंग व्यक्तीची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

अ) संबधित सेवाप्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार अर्हता असेल तर

ब) त्या त्या संवर्गातील पदांची कर्तव्य व जबाबदाऱ्या लक्षात घेऊन त्याप्रमाणे वैद्यकीय मंडळाने सक्षम ठरविल्यास,

क) तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील मधील विविध संवर्गात सोबतच्या परिशिष्ट "अ","ब" व "क" मध्ये दर्शविल्यानुसार अपंगत्वाच्या प्रत्येक प्रकारास प्रत्येकी १ टक्का या प्रमाणे एकूण ३ टक्के पर्यत सरळ सेवा भरतीने आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत गट "अ" व "ब" तसेच इतर मार्गाने तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत भरण्यात येणारी गट "क" व "ड" गटासाठी सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी व अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील अपंग उमेदवारासाठी शारिरीक पात्रतेचे निकष कोणते असावेत याचा तपशिल सोबतच्या परिशिष्ट-"अ" मध्ये दिलेला आहे. त्या निकषांवर अशा अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी .

४. पदोन्नतीच्या पदास व एकाकी पदास अपंगाचे आरक्षण लागू नाही.

३. केंद्र शासनाच्या यादीतील पदांव्यतिरिक्त तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-'अ','ब','क' व गट-'ड' मधील तसेच अशासकीय खाजगी अनुदानित व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्थेतील ज्या संवर्गातील पदांचा या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टांमध्ये समावेश नाही अशा संवर्गातील पदांचे अपंगांसाठी पद निश्चिती करणेबाबतचे आदेश तज्ञ समितीच्या मान्यतेनंतर स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४. हे आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील आदेशान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०११५१५१९१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(डॉ. अभय वाघ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव.
६. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
७. सर्व विभागीय तंत्र शिक्षण कार्यालये. (तंत्र शिक्षण संचालनालया मार्फत)
८. सर्व प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने.
९. सर्व अशासकीय खाजगी व स्वायत्त तंत्र शिक्षण संस्था.
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
११. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
१२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
१३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सामान्य प्रशासन विभाग, का.१६ अ व ब, (२प्रती) मंत्रालय, मुंबई.
१५. विभागातील सर्व कार्यासने.
१६. निवड नस्ती ताशि-१

| परिशिष्ट अ | | |
|---|---|---|
| अ.क्र. | पदनाम | अपंग प्रवर्गाचे आरक्षण |
| १ | २ | ३ |
| गट अ | | |
| **तंत्र शिक्षण संचालनालयातील प्रशासकीय पदे** | | |
| १ | संचालक, तंत्र शिक्षण | OL.BL.OA.OAL.B.LV.HH. |
| २ | सहसचांलक, तंत्र शिक्षण / संचालक, म.रा.तं.शि.मं | OL.BL.OA.OAL.B.LV.HH. |
| ३ | उपसंचालक, तंत्र शिक्षण / सचिव, म. रा.तं.शि.मं. | OL.BL.OA.OAL.B.LV.HH. |
| ४ | सहाय्यक संचालक (तांत्रिक) / उपसचिव (तांत्रिक) | OL.OA.B.LV.HH. |
| ५ | सिस्टीम मॅनेजर / ॲडमिनिस्ट्रेटर | OL.HH. |
| ६ | सहाय्यक सचिव (तांत्रिक) म.रा.तं.शि.मं. | OL.BL.OA.HH.B.LV. |
| ७ | सिस्टीम ॲनालिस्ट | OL.HH |
| ८ | प्रशासकीय अधिकारी / उपसचिव (अतांत्रिक) | OL.OA.B.LV.HH. |
| ९ | मुख्य लेखा व भांडार पडताळणी अधिकारी | BL.OA.OL.HH |
| **शासकीय व अशासकीय अनुदानित/स्वायत्त अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र, औषानिर्माणशास्त्र व हॉटेल मॅनेजमेट पदविका, पदवी व पदव्युत्तर पदवी संस्था / महाविद्यालये** | | |
| १० | प्राचार्य, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र. औषधनिर्माणशास्त्र व हॉटेल मॅनेजमेंट महाविद्यालये व पदविका संस्था | OA.OL.BL.B.LV |
| ११ | प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक / प्रपाठक/ विभाग प्रमुख, सहाय्यक प्राध्यापक व अधिव्याख्याता, अभियांत्रिकी / हॉटेल मॅनेजमेंट महाविद्यालये व पदविका संस्था | OL.BL.OA.B.LV |
| १२ | प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक / प्रपाठक/ विभाग प्रमुख, सहाय्यक प्राध्यापक व अधिव्याख्याता, वास्तुशास्त्र महाविद्यालये व पदविका संस्था | OL.OA.BL |
| १३ | प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक / प्रपाठक/ विभाग प्रमुख, सहाय्यक प्राध्यापक व अधिव्याख्याता, औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व पदविका संस्था | BLA.OL.OA.HH. |
| १४ | कर्मशाळा अधिक्षक | OL |
| १५ | परिक्षा नियंत्रेक | OA.OL.HH. |
| १६ | प्रशिक्षण व आस्थापना अधिकारी | OA.OL.LV. |
| गट ब | | |
| १७ | लेखा अधिकारी | BL.OA.OL.HH. |
| १८ | प्रबंधक/ सहाय्यक संचालक (अतांत्रिक)/ नियोजन अधिकरी / रचना व कार्यपध्दती अधिकारी / सहाय्यक सचिव (अतांत्रिक) | OA.OL.BL.LV. |

**ABBREVATIONS USED :-** OL=One Leg, BL=Both leg, OA=One Arm, OLA= One Arm & One Leg, B=Blind, LV= Low Vision, H=Hearing, MW=Muscular Weakness, OH=Orthopedically Handicapped, CP=Cerebral Palsy, LC=Leprosy Cured, VH=Visually Handicapped, HH=Hearing Handicapped

| परिशिष्ट ब | | |
|---|---|---|
| तंत्रशिक्षण संचालनालयाच्या मुख्य कार्यालय, शासकीय व अशासकीय अनुदानित संस्था / स्वायत्त संस्था/कार्यालयातील गट क ची पदे | | |
| अ.क्र | पदनाम | अपंग प्रवर्गाचे आरक्षण |
| १ | २ | ३ |
| १ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | OA.OL.BL.OAL.B.LV |
| २ | अधिक्षक | OL.OA.BL.OAL.B.LV. |
| ३ | लघुलेखक ( निम्न श्रेणी) | OA.OL.BL.OAL.B.LV. |
| ४ | प्रमुख लिपिक / लेखारिक्षक | OL.OA.BL.OAL.B.LV. |
| ५ | लघुटंकलेखक | OA.OL.BL.OAL.B.LV |
| ६ | वरिष्ठ लिपिक / टिप्पणी सहाय्यक | OL.OA.BL.OAL.B.LV. |
| ७ | लिपिक टंकलेखक | OL.BL.B.LV.HH |
| ८ | दूरध्वनी तथा चौकशी सहाय्यक | OA.OL.BL.B.LV |
| ९ | ग्रंथपाल | OA.OL.OAL.BL.HH |
| १० | कार्यदेशक | OL |
| ११ | डाटा एन्ट्री ऑपरेटर | OL.BL.LV.HH |
| १२ | भांडारपाल | OA.OL.HH |
| १३ | प्रभारक | OA.OL.BL.LV.HH. |
| १४ | रासायनिक सहाय्यक | OA.OL.BL.HH |
| १५ | सहाय्यक रासायनिक | OA.OL.BL.HH |
| १६ | फोटोग्राफर | OL,HH |
| १७ | प्रयोगशाळा सहाय्यक (तां) | OA.OL.BL.HH |
| १८ | वरिष्ठ प्रयोगशाळा सहाय्यक | OA.OL.BL.HH |
| १९ | यंत्रकारागिर/यांत्रिकी | OL.LV.HH |
| २० | कातारी | OL.LV.HH |
| २१ | वीजतंत्री | OL.HH |
| २२ | विद्युत मिस्त्री | OL.HH |
| २३ | वीजतंत्री यंत्री | OL.HH |
| २४ | कनिष्ठ विजतंत्री | OL.HH |
| २५ | संधाता | OL.HH |
| २६ | गॅस व वीज संधाता | OL.HH |
| २७ | जोडारी | OL.BL.LV,HH |
| २८ | सुतार | OL,HH |
| २९ | लोहार | OL.BL.,HH |
| ३० | गवंडी | OL.BL.HH |
| ३१ | नळ व पत्रे कारागीर | OL.HH |
| ३२ | नळ नि पत्रे कारागीर | OL.HH |
| ३३ | नळ कारगीर(स्था) सॅनि.फिटिं | OL.HH |
| ३४ | नळकारागीर (कर्मशाळी | OL.HH |
| ३५ | अभिरक्षक | OL.HH |
| ३६ | साचेकार | OL.BL.HH |
| ३७ | मोटर ऑपरेटर | OL.HH |
| ३८ | यंत्र सहाय्यक | |
| ३९ | यंत्र आरेखक (कर्मशाळा) | OL.HH |
| ४० | आरेखक यात्रिकी | OL.HH |
| ४१ | सहाय्यक गंथपाल | OA.OL.OAL.BL.HH |
| ४२ | भाडारपाल (एचएमसीटी) | OA.OL.HH |
| ४३ | लिपिक तथा भांडारपाल | OA.OL.HH |
| ४४ | पंपपरिचर | OL.LV.HH |

| | | |
|---|---|---|
| ४५ | प्रयोशाळा तंत्रज्ञ | OA.OL.OAL.BL.HH |
| ४६ | मशिन मकॅनिक | OL.LV.HH |
| ४७ | वाहन चालक | OL.HH |
| ४८ | उपकरण यात्रिकी | OA.OL.BL. |
| ४९ | आट्रिस्ट | OA.OL.OAL.BL.HH |

**ABBREVATIONS USED :-** OL=One Leg, BL=Both leg, OA=One Arm, OLA= One Arm & One Leg, B=Blind, LV= Low Vision, H=Hearing, MW=Muscular Weakness, OH=Orthopedically Handicapped, CP=Cerebral Palsy, LC=Leprosy Cured, VH=Visually Handicapped, HH=Hearing Handicapped

| परिशिष्ट क | | |
|---|---|---|
| तंत्रशिक्षण संचालनालयाच्या मुख्य कार्यालय, शासकीय व अशासकीय अनुदानित संस्था /स्वायत्त संस्था / कार्यालयातील गट ड ची पदे | | |
| अ.क्र | पदनाम | अपंग प्रवर्गाचे आरक्षण |
| १ | हमाल | OL,HH,LV/B |
| २ | हमाल दर्जा -१ | OL,HH,LV/B |
| ३ | यंत्रपरिचर दर्जा -१ | OL,OA,LV/B |
| ४ | यंत्रपरिचर दर्जा -२ | OL,OA,LV/B |
| ५ | प्रयोगशाळा परिचर | OA,OL,DL,HH,LV |
| ६ | शिपाई | OL,HH,LV/B |
| ७ | पहारेकरी | OL,BL,HH |
| ८ | माळी | OL,HH,L,V,B |
| ९ | सफाईगार/ सफा. परिचर | OL,HH,L,V,B |
| १० | पंपपरिचर | OL,LV,HH |
| ११ | झेरॅक्स ऑपरेटर | OL.BL.HH |

**ABBREVATIONS USED :-** OL=One Leg, BL=Both leg, OA=One Arm, OLA= One Arm & One Leg, B=Blind, LV= Low Vision, H=Hearing, MW=Muscular Weakness, OH=Orthopedically Handicapped, CP=Cerebral Palsy, LC=Leprosy Cured, VH=Visually Handicapped, HH=Hearing Handicapped